श्री.वसंत संखे, उप सचिव, यांच्या महाराष्ट्र राज्य
अपंग वित्त व विकास महामंडळावरील व्यवस्थापकीय
संचालक, या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती
निश्चित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : अविम २००१/प्र.क्र. ३६४/सुधार -३**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ११ नोव्हेंबर, २००३**

**पहा:** १) शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक इडीडी-२००१/प्र.क्र.६५/सुधार-३ दिनांक २१ नोव्हेंबर, २००१
२) शासन निणैय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक:अविम२००१/प्र.क्र३६४/सुधार -३ दिनांक २४ जानेवारी, २००२

**शासन निर्णय:-** श्री. वसंत संखे उप सचिव, यांची महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळावरील व्यवस्थापकीय संचालक, या पदावर शासन निर्णय समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक:अविम २००१/प्र.क्र.३६४/सुधार -३, दिनांक २४ जानेवारी,२००२ अन्वये दिनांक २४/१/२००२ (म.पू.)पासून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे. श्री.वसंत संखें यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती विहित करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन आता असा आदेश देत आहे की, त्यांच्य प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट " अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे असतील.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने त्यांच्या अनौ.संदर्भ क्रमांक ५७५ /सेवा -२, दिनांक १७ जुलै, २००२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

वैअपारकर

( वै.अ.पारकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
श्री.वसंत संखे, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई,
मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मा.मंत्री,सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री,सामाजिक न्याय, यांचे खाजगी सचिव,
व्यवस्थापकीय संचालक,महात्मा फुले मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ, मुंबई,
मा.अध्यक्ष,महाराष्ट्र राज्यअपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित व विकास महामंडळ, मुंबई,
महालेखापाल महाराष्ट्र -१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

सामान्य प्रशासन विभाग, ( का. १४) मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, (सेवा -२, सेवा -३, सेवा -५) मंत्रालय, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
निवड नस्ती (कार्यासन - सुधार -३)

**परिशिष्ट "अ"**

(शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य, व क्रिडा विभाग क्रमांकःअविम २००१/प्र.क्र.३६४/सुधार -३, दिनांक :-११ नोव्हेंबर २००३ चे सहपत्र)

श्री.वसंत संखे, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई, यांच्या, "व्यवस्थापकीय संचालक", महाराष्ट्र राज्य वित्त व विकास महामंडळ, मुंबई, या पदावरील प्रतिनियुक्तीच्या

**अटी व शर्ती :-**

**१) प्रतिनियुक्तीचा कालावधी :-**श्री.वसंत संखे, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई ( दिनांक २४/०१/२००२ म.पु.) त्यांचा स्वीयेत्तर सेवेचा प्रारंभ होईल. - श्री.वसंत संखे, हे प्रथमतः तीन वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीवर राहतील. प्रतिनियुक्ती कालावधीत त्यांच्या "उपसचिव" या पदावर धारणाधिकार राहील परंतु

**(एक)** जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने त्यांच्या विभागाला /शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार त्यांचा विभाग/ सक्षम प्राधिकारी राखून ठेवीत आहे.

**(दोन)** जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मूभा स्वीयेत्तर नियुक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने त्यांच्या विभागाला /सक्षम प्राधिका-यांला तीन महिन्याची नोटीस दिली पाहीजे.

**(तीन**) त्यांची मूळ विभागाकडे परत जाण्याची इच्छा असल्यास त्यांनी कमीत कमी तीन महिन्याची नोटीस त्यांच्या विभागाला /सक्षम प्रधिका-याला दिली पाहीजे. जेणेकरुण त्याना आपल्या मूळ विभागाकडे परत जाण्याची मूभा राहील.

**२) प्रतिनियुक्ती भत्ता :-**शासकीय कर्मचा-याला स्वीयेत्तर सेवेत असताना, सर्वसाधारण नियमानुसार प्रतिनियुक्तीच्या पदाचे वेतन निश्चित करुन घेणे किंवा जर त्यांची स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्ती झाली नसली तर त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या लगतपूर्वी त्यांनी जे पद धारण केले होते, त्या उपसचिव या पदाकरीता विहित केलेल्या वेतनात, मूळ विभागाकडे जे वेतन घेतले असतें ते वेतन अधिक शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक स्वीयेसे १०८८/प्र.क्र. १०९३/सेवा -२ , दिनांक ०८ जुलै १९९० च्या आदेशानुसार सुधारीत तरतुदीस अनुसरुन ज्या स्वीयेत्तर सेवेतील कर्मचा-यांनी शासनाकडील वेतन व त्यावर प्रतिनियुक्ती भत्ता घेण्यासाठी विकल्प दिला असेल त्यांना यापुढील प्रमाणे प्रतिनियुक्ती भत्ता देण्यात यावा :-

**(अ)** जेव्हा शासकीय कर्मचा-याची प्रतिनियुक्ती मूळच्याच ठिकाणी असेल तेव्हा दरमहा रु. २५०/- कमाल मर्यादेच्या अधिनतेने त्यांच्य मूळ वेतनाच्या ५ टक्के.

**(ब)** इतर प्रकरणी, म्हणजे जेव्हा शासकीय कर्मचा-याची प्रतिनियुक्ती मूळच्या ठिकाणाव्यतीरिक्त इतर ठिकाणी असेल तेव्हा दरमहा रु. ५००/- कमाल मर्यादेच्या अधिनतेने त्यांच्या मूळ वेतनाच्या १० टक्के मात्र त्यांचे मूळ वेतन अधिक प्रतिनियुक्ती भत्ता हा कोणत्याही परिस्थितीत दरमहा रु. २२,४००/- पेक्षा जास्त होता कामा नये.

**टिपः- वरील (अ) च्या प्रयोजनासाठी "मूळच्या ठिकाणी" याचा अर्थ" प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वीचे कर्मचा-याच्या नियुक्तीचे ठिकाण" असा असेल.**

वरील परिच्छेदाप्रमाणे अनुज्ञेय होणारा प्रतिनियुक्ती भत्ता आणखी असा मर्यादित केला जाईल की, त्यांच्य मूळ विभागातील संवर्गात त्यांना वेळोवेळी देय झालेले मूळ वेतन व प्रतिनियुक्ती भत्ता यांची एकूण बेरीज प्रतिनियुक्तीवर धारण केलेलया पदाच्या वेतनमानातील कमाल वेतनाहून किंवा प्रतिनियुक्तीचे पद नियत वेतनावरील असेल तर त्या नियत वेतनाहून अधिक होता कामा नये.

**३) महागाई भत्ता :-** श्री.वसंत संखे, उपसचिव, यांना शासनाने वेळोवेळी मंजूर केलेल्या दराने महागाई भत्ता मिळेल.

**४) निवासस्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता तसेच स्थानिक पूरक भत्ता :-**

i) श्री.वसंत संखे हे शासकीय निवासस्थानात राहात असतील व सदर शासकीय निवासस्थान स्वताःजवळ ठेवण्यास सामान्य प्रशासन विभागाने अनुमती दिलेली असेल तर प्रतिनियुक्तीवर गेल्याच्या दिनांकापासून पहिले ३ महिने सामान्य दराने व त्यानंतर आर्थिक दराने अनुज्ञप्ती शुल्क आणि नियमानुसार सेवा शुल्क महाराष्ट्र राज्य

अपंग वित्त व विकास महामंडळ शासनास देईल. महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ प्रतिनियुक्तीच्या कालावधीमध्ये श्री.संखे यांच्या वेतनातून विहित सामान्य दराने अनुज्ञप्ती शुल्क व नियमानुसार सेवाशुल्क वसूल करेल.

महामंडळाच्या नियमानुसार त्यांना अनुज्ञप्ती शुल्क माफ निवासस्थान सुविधा देय असेल तर त्यांचा लाभ श्री. वसंत संखे यांना घेता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय किंवा महामंडळाचे निवासस्थान नसेल तर त्यांना राज्य शासनाच्या नियमानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असलेला घरभाडे भत्ता देय असेल.

ii) श्री वसंत संखे यांना राज्य शासनाच्या नियमानुसार / आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय दरांने स्थानिक पुरक भत्ता देय असेल.

**५) <u>पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता</u> :-** स्वीयेत्तर सेवेत दाखल झाल्यानंतर व स्वीयेत्तर सेवेतून प्रत्यावर्तीत झाल्यानंतर अशा दोन्ही वेळच्या प्रदग्रहण अवधीमध्ये त्यांचे वेतन व प्रवास भत्ता राज्य शासनाच्या सबंधित नियमानुसार स्वीयेत्तर नियोक्त्याकडून देण्यात येतील.

**<u>६) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरीता प्रवास भत्ता व दैनिक भत्ता :-</u>**
श्री.वसंत संखे, यांना स्वीयेत्तर सेवेत रुजू झाल्यानंतर, कराव्या लागणा-या प्रवासाकरीता राज्य शासनाच्य किंवा स्वीयेत्तर नियोक्त्याला नियमानुसार **प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता** मिळण्याचा हक्क असेल.

**<u>७)रजा व रजा वेतन:-</u>**श्री. वसंत संखे, यांना सदर प्रतिनियुक्तीपूर्वी लागू असलेले रजेचे नियम प्रतिनियुक्तीनंतरही लागू होत राहतील. याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (रजा नियम,१९८१ च्या कलम १८ (२) मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. स्वीयेत्तर सेवेतून कार्यमुक्त झाल्यानंतर त्यांना परस्पर रजेवर जाण्यास स्वीयेत्तर नियोक्त्यांने परवानगी देता कामा नये. म्हणजेच प्रथम मूळ कार्यालयाच्या सेवेत रुजू होऊन मूळ विभागातील सक्षम प्राधिका-याकडून नेहमीच्या पध्दतीने त्यांनी आपली रजा मंजूर करुन घेतली पाहीजे.

स्वीयेतर सेवेच्या दरम्यान किंवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबदल द्यावयाच्या कोणत्याही रजा वेतन व भत्याच्या संबंधातील संपूर्ण खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याला सोसावा लागेल.

**<u>८) विकलांगला रजेबदल रजा वेतन :-</u>** स्वीयेत्तर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबदल मंजूर करता येंईल, अशा रजेच्या सबंधात अशी विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरी सुध्दा, रजा वेतन देण्यास स्वीयेत्तर नियोक्ता जबाबदार असेल व अशा रजा वेतनावरील खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याकडून वसुल करण्यात येईल.

**<u>९) रजा वेतन आणि निवृत्ती वेतन अंशदान :-</u> (ए)** महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन बढती व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ मधील परिशिष्ट चार मध्ये विहित केलेल्या दरानुसार स्वीयेत्तर नियोक्त्याकडून रजा वेतन आणि निवृती वेतन अंशदाने देण्यात येतील.

**(बी)** स्वीयेत्तर नियोक्ता, प्रत्येक वित्तीय वर्षाच्या अखेरीपासून पंधरा दिवसाच्या आत किंवा वित्तीय वर्ष संपण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतील प्रतिनियुक्ती समाप्त होत असेल तर स्वीयेत्तर सेवेच्या अखेरीस महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी-इ.) नियम १९८१ मधील परिशिष्ट - दोन मधील अट क्र. ११ मध्ये तरतुद केल्यानुसार परिशिष्ट -चार मधील नियम ६ मध्ये दिलेल्या दराने "रजा वेतन" व " निवृती वेतनाचे अंशदान" देण्यात यावे.

**<u>अंशदानाच्या रकमा पुढील लेखाशिर्षाखाली जमा कराव्यात.:-</u>**

**१) निवृत्ती वेतन अंशदान:- ०६६- निवृत्ती वेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ यांच्या सबंधातील अंशदाने वसुलीच्या रक्कमा - ए - वर्गण्या व अंशदाने (एक) स्वीयेत्तर सेवेतील अधिकारी ."**

**२)रजा वेतन अंशदान : "००७० -इतर प्रशासकीय सेवा -६०- इतर सेवा-८०० - इतर जमा रक्कमा (नऊ) "**

उपरोक्त दर लेखापरीक्षा कार्यालयाकडून कायम केले जाईपर्यत तात्पुरते मानले जातील. आणि ते भूतलक्षी प्रभावाने समायोजित करता येतील. स्वीयेत्तर सेवेतील रजा वेतनाची किंवा निवृती वेतनाची देय असणारी अंशदाने पूर्वोवतकालावधीत दिली गेली नाहीत तर शासनाने स्पष्टपणे सुट दिलेली नसल्यास स्वीयेत्तर नियोक्ता हा अदत्त अंशदानाच्या रक्कमेवर म्हणजेच प्रतिनियुक्तीच्या कालावधी संपणा-या तारखेपासून अंशदाने अंतिमरित्या दिल्याच्या तारखेपर्यंत देय होणा-या रक्कमेवर दर दिवशी प्रत्येक १०० रुपयास दोन पैसे या दराने शासनाला व्याज देईल. रजा वेतन अंशदाने आणि निवृती वेतन अंशदाने निरनिराळया लेखाशिर्षाखाली जमा केली जात असल्यामुळे ती वेगवेगळी भरावी आणि कोणत्याही बाबीदाखल शासनाकडून वसुली करावयाच्या येणे रक्कमेची अशा अंशदानातून वजावट करण्यात येऊ नये.

**१०) <u>रजा मुदती प्रवास सवलत :-</u>** राज्य शासनाच्या सबंधित नियमानुसार श्री. वसंत संखे, यांना रजा मुदती प्रवास सवलती मिळण्याचा हक्क असेल. यासबंधातील खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याला सोसावा लागेल.

**११) वैद्यकीय सवलती :-** शासकीय कर्मचा-याला महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय उपचार) नियम , १९६१ नुसार अनुज्ञेय असणा-या वैद्यकीय सुविधापेक्षा कमी प्रतीच्या नसतील अशा सुविधा मिळण्याचा श्री. संखे यांना हक्क असेल आणि त्यावरील खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याला सोसावा लागेल.

**१२) सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीची वर्गणी:-** श्री. वसंत संखे, हे नियमानुसार ज्या सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीचे वर्गणीदार असतील त्याच निधीला ते वर्गणी देणे चालू ठेवतील.

**१३) विभागीय चौकशी :-** श्री. वसंत संखे, यांचे विरुध्द विभागीय चौकशी सुरु करावयाची असेल तर त्यांना त्यांच्य मूळ विभागाकडे परत पाठविण्यात येईल. त्यांचे कार्यालय त्यांना निर्वाह भत्ता देईल. पण तो स्वीयेत्तर नियोक्त्याकडून वसूल करण्यात येईल.

**१४) प्रपत्र बढती :-** श्री. वसंत संखे, हे प्रतिनियुक्तीवर असताना त्यांची मूळ विभागात बढती होण्याची वेळ असली तर सर्वसाधारणपणे त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेवू नये. तथापी, जर सक्षम प्राधिका-यांने त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेवली तर त्यांना प्रतिनियुक्ती भत्ता न देता निकट निम्नता नियमानुसार बढतीच्या पदाचे वेतन मंजूर केले जाईल आणि निकट निम्नता नियमाचा लाभ सहा महिन्यानंतर अनुज्ञेय असणार नाही.

**१५) कायमचे समावेशन :-**जर श्री. वसंत संखे, यांची महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळामधील सेवेमध्ये सामावून घेतले जाण्याची इच्छा असेल तर त्यांना सामावून घेतले जाईल. तथापी, त्या तारखेला ते आपल्या मूळ कार्यालयाच्या सेवेतून निवृत्त झाल्याचे मानले जाईल.

**१६) गट विमा योजना:-** मासिक वेतनातून गट विमा योजनेची योग्य ती वर्गणी वसुल करुन ती लेखाशिर्ष " ८०११- विमा व निवृती वेतन निधी -१ महाराष्ट्र राज्य शासकीय कर्मचा-यांची गट विमा योजना" याखाली स्वीयेत्तर नियोक्ता जमा करील.

शासन निर्णय दिनांक २८/२/८६ नुसार बदल जर एखादा कर्मचारी प्रतिनियुक्तीवर किंवा परकीय सेवेत गेला तर त्यास प्रतिनियुक्तीवर घेणा-या प्राधिकरणास/ परकीय मालकास, वर्गणी वसूल करण्याची अणि ती संबव्द लेखाशिर्षामध्ये जमा करण्याची विनंती करण्यात येईल. भावी काळात प्रतिनियुक्तीच्या / परकीय सेवेच्या अटीमध्ये या आशयाचे आवश्यक ते कलम समाविष्ट करण्यात आले आहे. याची खात्री करुन घेण्यात येईल. रजा वेतन आणि निवृत्ती वेतन अंशदान यांच्या वसुलीवर ज्या पध्दतीने लक्ष ठेवले जाते त्याच पध्दतीने या रक्कमेच्या वसुलीवरही लक्ष ठेवण्यात येईल. कोणत्याही वेळी वर्गणीची वसुली थकबाकीत गेली तर ती थकबाकी बचत निधीतील जमा रक्कमेवर "योजने" नुसार अनुज्ञेय असलेलया व्याजासह तीनपेक्षा अधिक नाही इतक्या हप्त्यामध्ये वसूल करण्यात येईल.

**१७) निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता :-** श्री. वसंत संखे, यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या निवासस्थानी शिपाई दिला नसल्यास व श्री वसंत संखे यांना प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी निवासी शिपायाऐवजी रोख परतावा अनुज्ञेय असल्यास किंवा महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळातील अधिका-यांना निवासी शिपायाऐवजी रोख परतावा अनुज्ञेय असल्यास त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्याच दरांने रोख परतावा अनुज्ञेय असेल. मात्र असा भत्ता घेण्यापूर्वी अधिका-यांच्या निवासस्थानी शिपाई दिलेला नाही असे प्रमाणपत्र दरमहा त्यांना देणे आवश्यक राहील.

**१८) निवासी वृतपत्राच्या खर्चाची प्रतिपूर्ती :-** श्री. वसंत संखे यांना त्यांच्य निवासस्थानी एक इंग्रजी व एक मराठी दैनिक विकत घेता यईल व त्यांचा खर्च महामंडळास सोसावा लागेल.

**१९) निवासी दूरध्वनीच्या खर्चाची प्रतिपूर्ती :-** श्री वसंत संखे, यांच्या निवासस्थानी महामंडळाने स्वतंत्र दूरध्वनी द्यावा किंवा श्री संखे यांनी त्यांचा खाजगी दूरध्वनी महामंडळाच्या कामकाजासाठी वापरण्याची तयारी दर्शविल्यास, व्यवस्थापकीय संचालकांना ज्या अनुज्ञेय दराने निवासी दूरध्वनीच्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यात येते, त्याच दराने निवासी दूरध्वनीच्या खर्चाची प्रतिपूर्ती महामंडळाने करावी.

**२०) वाहन किंवा वाहन भत्ता :-** श्री.वसंत संखे, यांना महामंडळाने वाहन उपलब्ध करुन द्यावे. महामंडळाने उपलब्ध करुन दिलेल्या वाहनांचा खाजगी वापर त्यांनी खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येईल.:-

**(अ)** वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलोमीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांना वेळोवेळी विहित करण्यात येणा-या दराने भाडे भरावे लागेल.

**(ब)** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरए १०९०/सीआर ३२० /९० एसईआर -५, दिनांक १७/१०/१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवानगी असेल. मात्र सबंधित आदेशात वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणा वाहनाच्या खाजगी वापराबाबत आपोआप लागू असतील.

**२१) प्रतिनियुक्ती कालावधीत देशात / परदेशात प्रवास :-** श्री.वसंत संखे, हे प्रतिनियुक्तीवर असताना त्यांना महामंडळाच्या कामासबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्व परवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र महामंडळाच्या कामाच्या सबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्व परवानगी_आवश्यक असेल. त्याचप्रमाणे महामंडळाच्या कामाशी सबंध नसलेल्या शासकीय / निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थाच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहील.

**२२) शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे :-** श्री. वसंत संखे, यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम / कार्यकारी आदेश त्यांना लागू असतील.

**२३) विहित अटी / शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी / शर्तीबाबत :-** वर नमूद केल्या अटी / शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या विशिष्ट अटी / शर्तीबाबत त्या त्या संवर्गातील अधिका-यांना जे जे कार्यकारी आदेश लागू असतील ते ते कार्यकारी आदेश श्री. वसंत संखे यांनाही लागू असतील.

**************